ठाणे शहर पोलीस आयुक्तालयातील परिमंडळ १,२,३ (Integration), ४ व ५ या विभागात सीसीटीव्ही यंत्रणा उभारण्याच्या एकुण रु.५७५,८७,८१,३६२/- (जीएसटीसह) इतक्या खर्चाच्या कामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीसीटी ०७२२/प्र.क्र.८७/पोल-३**
गृह विभाग,२ रा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ९.४.२०२५.

**वाचा :-**

१) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समिती (H.P.C.) च्या दि.५.७.२०२३ व दि. ९.१०.२०२३ व दि. २७.५.२०२४ व दि. ३०.९.२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र.सीसीटी ०७२२/प्र.क्र.८७/पोल-३, दि.५.१.२०२४ व ५.७.२०२४
३) अपर पोलीस महासंचालक (नि.व स.), महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/१७/ ठाणे शहर CCTV प्रकल्प/ २८/२०२१,दि. १७.१०.२०२४, दि. ३१.१.२०२५.

<u>प्रस्तावना</u> :-

ठाणे शहर पोलीस आयुक्तालयातील परिमंडळ १,२,४ व ५ या ठिकाणी सीसीटीव्ही यंत्रणा उभारण्याबाबत ठाणे पोलीस आयुक्तालयातील परिमंडळ १,२,३ (Integration) ४ व ५ मध्ये वाढीव एकूण ६०५१ सीसीटीव्ही कॅमेराच्या रु.४९२,८९,४१,१६७/-एवढ्या रक्कमेच्या प्रकल्प अहवालास दि.९.१०.२०२३ रोजीच्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीने अंतिम मान्यता दिली व त्यानुसार दि.५.१.२०२४ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला.

तद्नंतर दि.३०.९.२०२४ रोजीच्या अ.मु.स. (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीत रु.४९२,८९,४१,१६७/- ही रक्कम जीएसटी कराशिवाय नमूद करण्यात आली असल्याने दि.५.१.२०२४ रोजीच्या रु.४९२,८९,४१,१६७/- प्रशासकीय मान्यतेच्या शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्याबाबत संदर्भ क्र.३ दिनांक ३१.१.२०२५ च्या पत्रान्वये पोलीस महासंचालक कार्यालयाने सादर केलेल्या अहवालानुसार रु.५७५,८७,८१,३६२/-(अक्षरी रुपये

पाचशे पंच्याहत्तर कोटी सत्त्याऐंशी लाख एक्याऐंशी हजार तीनशे बासष्ट फक्त) (जीएसटीसह) इतक्या रक्कमेचे सुधारीत प्रशासकीय मान्यतेचे आदेश निर्गमित करण्यात निर्णय घेण्यात आला आहे. दि.३०.९.२०२४ रोजीच्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयास अनुलक्षून निर्गमित करावयाच्या "सुधारीत प्रशासकीय मान्यतेचा शासन निर्णय" प्रसिध्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती, त्यानुसार खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

"ठाणे पोलीस आयुक्तालयाने अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखालील दिनांक ३०.९.२०२४ रोजीच्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीमध्ये सादर केलेल्या ठाणे शहर पोलीस आयुक्तालयातील परिमंडळ १,२,३ (Integration), ४ व ५ या विभागात वाढीव एकूण ६०५१ सीसीटीव्ही कॅमेराच्या रु.५७५,८७,८१,३६२/-(अक्षरी रुपये पाचशे पंच्याहत्तर कोटी सत्त्याऐंशी लाख एक्याऐंशी हजार तीनशे बासष्ट फक्त) (जीएसटीसह) एवढ्या रक्कमेच्या प्रकल्प अहवालास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत प्रकरणी उपरोक्त प्रमाणे होणारा खर्च हा "मागणी क्र.बी-१०, ४०५५ - पोलीस यावरील भांडवली खर्च, ८०० इतर खर्च, (००) (०९) सीसीटीव्ही यंत्रणा बसविणे (४०५५ ०२२३) या अंतर्गत ५२ यंत्रसामुग्री साधनसामुग्री, व १३- कार्यालयीन खर्च" या लेखाशीर्षांखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या-त्या वर्षाच्या उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय अपर मुख्य सचिव (गृह) यांचे अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दि.२७.५.२०२४ व दि.३०.९.२०२४ रोजीच्या बैठकीतील निर्णयास अनुलक्षून वित्त विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच सदर प्रकल्पांचा निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी पोलीस आयुक्त,ठाणे यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून तसेच त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्याला "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आला असून त्याचा संकेतांक २०२५०४०९१७४१०६८९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA TANAJI BHALWANE

Digitally signed by RAJENDRA TANAJI BHALWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=38d121bf4a170d16dacf98520f0ac44551976931d27581 48ccaa24d1fb27b9df, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BADFC0DAA40CC485400AAD9CEABCD51409565 9A6CDFAC856815518DCD188C23A, cn=RAJENDRA TANAJI BHALWANE
Date: 2025.04.09 17:42:08 +05'30'

**( रा. ता. भालवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान, मंत्रालय, मुंबई.
१०. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. पोलीस आयुक्त, ठाणे.
१२. आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे.
१३. आयुक्त, भिवंडी निझामपूर शहर महानगरपालिका, भिवंडी, जि. ठाणे.
१४. आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका, उल्हासनगर जि. ठाणे.
१५. मुख्याधिकारी, अंबरनाथ नगरपरिषद, अंबरनाथ, जि. ठाणे.
१६. मुख्याधिकारी, कुळगाव-बदलापूर नगरपरिषद, अंबरनाथ, जि. ठाणे.
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र १ / २ , मुंबई/नागपूर.
१८. अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१९. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
२०. वित्त विभाग (व्यय-७ / वित्तीय सुधारणा) मंत्रालय, मुंबई.
२१. सहसचिव (पोल-१४ / अर्थसंकल्प शाखा) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. निवडनस्ती पोल-३.